विविध आरोग्य संदेशांचे आरोग्य शिक्षण
साहित्य तयार करुन जिल्हयांना पुरवठा
करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय, क्रमांकः आयईसी २०१७/प्र.क्र.३१ /आरोग्य ३

१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २८ ऑगस्ट, २०१७.

**वाचा :**

१) **उपसंचालक, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक- राआशिसंवि/भांडार/आशिसा/नि.प्रस्ताव/न.क्र -२८/ /१६,दिनांक २०.१०.२०१६.**

२) **उपसंचालक, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे यांचे पत्र क्रमांक- उपसंआसे/राआशिवसंवि/भांडार/आशिसा/नि.प्रस्ताव/न.क्र -२८/२८८९-९१ /१७, दिनांक २०.१०.२०१६.**

**शासन निर्णय:**

राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत विविध आरोग्य संदेशांचे आरोग्य शिक्षण साहित्य तयार करुन जनजागृतीसाठी राज्यातील जिल्हयांना पुरवठा करणेसंदर्भात खाली नमूद उपक्रमांच्या माहितीचे घडीपत्रिका, प्लॅशकार्ड, पोस्टर्स व बॅनर्स तयार करणे आणि त्यासाठी आवश्यक अनुदान खर्च करण्यास याव्दारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

**रु.लाखात**

| अ.क्र. | उपक्रम | तपशिल | अपेक्षित खर्च |
|---|---|---|---|
| १ | योजना/राष्ट्रीय कार्यक्रमा अंतर्गत माहितीच्या **घडीपत्रिका** जनजागृती | लसीकरण, डेंगी, हिवताप, स्तनपान, मुलींच्या विवाहाचे योग्य वय, गर्भनिरोधक साधने, प्रसवपुर्व गर्भ निदान, जननी शिशु सुरक्षा | १०.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| | साठी छपाई करुन जिल्हयांना पुरवठा करणे | कार्यक्रम,किशोरवयीन मुलामुलींकरीता माहिती, अवयवदान या दहा विषयांच्या घडीपत्रिका छपाई करुन जिल्हयांना पुरवठा करणे.<br>आकार- ९.५" x ११" , एकूण ४ पाने,<br>कागद- १३० जीएसएम आर्टपेपर,<br>छपाई- पाठोपाठ चार रंगात सचित्र ऑफसेट प्रिंटींग, फोल्डींग/क्रिझींग/पॅकींगसह.<br>सदर काम ई निविदा प्रक्रियेव्दारे-करुन घ्यावे. | |
| २ | राष्ट्रीय कार्यक्रमांतर्गत माहितीच्या **प्लॅशकार्ड** जनजागृतीसाठी छपाई करुन जिल्हयांना पुरवठा करणे | बाळाचे लसीकरण व घ्यावयाची काळजी, डेंगी, हिवताप, स्तनपान पुरक आहार, नवविवाहीतांसाठी जन्म मृत्यु नोंदणी, प्रसवपुर्व गर्भलिंग निदान, पहिलटकरणीसाठी, किशोरवयीन मुलामुलींकरीता माहिती, पुरुष नसबंदी या विषयांची प्लॅशकार्ड छपाई करुन जिल्हयांना पुरवठा करणे.<br>आकार- ९" x ६" ,<br>कागद- २१० जीएसएम आर्टपेपर,<br>छपाई- पाठोपाठ चार रंगात सचित्र ऑफसेट छपाई लॅमिनेशनसह<br>सदर काम ई निविदा प्रक्रियेव्दारे-करुन घ्यावे. | १५.०० |
| ३ | राष्ट्रीय कार्यक्रमांतर्गत माहितीची **पोस्टर्स** जनजागृतीसाठी छपाई करुन जिल्हयांना पुरवठा करणे | डेंगी, हिवताप, जन्माचे महत्व, किशोर अवस्थांमधील काळजी, मधुमेह, गर्भनिरोधक साधने, जन्म मृत्यु नोंदणी विषयाची पोस्टर्स, छपाई करुन जिल्हयांना पुरवठा करणे.<br>आकार- १७" x २३" ,<br>कागद- ९० जीएसएम मॅपलिथो पेपर,<br>छपाई- चार रंगात सचित्र, पाठीमागील बाजू पांढरी व गम अथवा अडकविण्यासाठी आयलेट सुविधा, पुढील बाजूस लॅमिनेशनसह.<br>सदर काम फोटो झिंको मुद्रणालय, पुणे यांचेकडून करून घ्यावे. | २०.०० |
| | मोठया धार्मिक यात्रा, | राज्यात होणा-या मोठया महोत्सवावेळी | ६.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| | राज्यामध्ये राष्ट्रीय स्तरावरील शुभारंभ इ.वेळी जनजागृती/ प्रसिध्दी करणे | जनजागृतीसाठी स्वच्छता, साथरोग या विषयाची **बॅनर्स** तयार करुन जिल्हयांना वाटप करणे.<br>सदर काम शासन निर्णय, सा.वि.प्र., दिजुलै १४., २०१६ अन्वये नियुक्त मेपुणे .कल्याणी कार्पो. यांचेकडून शासनमान्य दरानुसार करूनघ्यावे. | |
| | | **एकूण** | **५१.००** |

२. सदर उपक्रमावरील खर्च केंद्र शासनाने मंजूर केलेल्या आय.ई.सी.पी.आय.पी.२०१६-१७ नुसार राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत प्रसिध्दी व जनजागृतीसाठी **B 10 (IEC - BCC NHM)** मधील मंजूर असलेल्या आणि सन २०१७-१८ साठी Committed Expenditure म्हणून ठेवण्यात आलेल्या निधीमधून भागविण्यात येईल .

**३.अटी व शर्ती-:**

१) सदर खरेदीसाठी शासन निर्णय, उदयोग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग III/उदयोग-४, दि.०१.१२.२०१६ अन्वये प्रसिध्द केलेल्या सुधारीत नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा. एकलस्रोत खरेदीबाबत सदर शासन निर्णयामधील “शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका” यात नमूद परिच्छेद क्रमांक ३.२.३ येथील तरतुदीनुसार तसेच विहित कार्यपध्दतीस अनुसरुन करण्यात यावी.

२) खरेदी करावाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) संबंधीत तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी) मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देश के कोणत्याही कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच त्याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत.त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती निश्चित करण्यात आलेला दर हा बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधीत पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

४) खरेदी करण्यात येणा-या बाबींची पुरवठापुर्व /पुरवठयानंतर नमुना तपासणी (Pre/post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विर्निदेश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणा-या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (Storage and Distribution) करणे तसेच पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply Chain management) व वस्तुसुची व्यवस्थापन (inventary Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहित मुदतीत वापर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

६) सदर खरेदीची व्दिरुक्ती (Duplication) होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

७) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबवितांना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelince) तंतोतंत पालन करण्यात यावे.

८) शासननिर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र. ६ मधील अटींची पूर्तता करण्यात यावी.

९) खरेदी प्रक्रिया पुर्ण झाल्यानंतर केंद्रीय खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमीत करण्यात यावेत.

४. सदर शासन निर्णय, शासननिर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२८१२१५४३९३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2017.08.28 15:54:31 +05'30'

**( रो.दि.कदम पाटील )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल- १ / २, महाराष्ट्र, (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. उप संचालक, आरोग्य सेवा, राज्य आरोग्य शिक्षण व संपर्क विभाग, पुणे.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६. वित्त विभाग (कोषागारे/ प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
७. कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३).